श्रीवर्धन पं.स.(जि.रायगड) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१३/प्र.क्र.२१७/पंरा-७

मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीखः ९ सप्टेंबर,२०१४

वाचा :-

1) **कार्यकारी अभियंता (बांधकाम) जि.प., रायगड यांचे पत्र क्र. राजिप/बांखा/प्रशा.२/४३५२/१३ दिनांक ६.६.२०१३ व दिनांक ५.९.२०१३**

प्रस्तावना :-

१. कार्यकारी अभियंता (बांधकाम) जि.प., रायगड यांनी वरील पत्रान्वये श्रीवर्धन पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. श्रीवर्धन पंचायत समितीची अस्तित्वातील इमारत ही मुख्य बाजारपेठेत असून, बांधकामाचे एकूण क्षेत्रफळ १९८.०० चौ.मी. इतके आहे. सदरहू प्रशासकीय इमारत कार्यालयीन कामकाजासाठी अपूरी पडत असल्याने पंचायत समितीच्या अधिनस्थ सर्व कार्यालये एकाच ठिकाणी आणण्याकरीता मध्यवर्ती तहसिल प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या व दुसऱ्या मजल्यावर श्रीवर्धन पं.स.च्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम हाती घेण्याबाबत पंचायत समितीने दिनांक ३.७.२०१४ रोजी ठराव पारित केला आहे. श्रीवर्धन येथील न.भू.क्र.१५ या शासकीय जागेवरील तहसिल मध्यवर्ती प्रशासकीय इमारतीचे तळमजल्यावरील बांधकाम हे मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि., मुंबई यांच्या जॉब नं.टी-एडीएम/५५११, दिनांक ७.१.२०११ या टाईप प्लॅन वर आधारीत आहे. सदरहू इमारतीचे आर.सी.सी. संकल्पन हे तळ मजला अधिक दोन मजले इतका भार पेलण्यास सक्षम असल्याचे कार्यकारी अभियंता, सा.बां. महाड उपविभाग यांनी जिल्हाधिकारी, रायगड यांना दिनांक २१.६.२०१४ पत्रान्वये कळविलेले आहे. तसेच तहसिल इमारतीच्या वरच्या मजल्यावर श्रीवर्धन पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम हाती घेण्यास जिल्हाधिकारी, रायगड यांनी दिनांक २३.६.२०१४ च्या पत्रान्वये सहमती दर्शविली आहे. त्यानुसार कार्यकारी अभियंता (बांध) जि.प., रायगड यांनी श्रीवर्धन पं.स.च्या नवीन प्रशासकीय इमारतीकरीता तहसिल इमारतीच्या पहिल्या मजल्याच्या मागील भागात ७९८.०० चौ.मी. आणि दुसऱ्या मजल्याच्या मागील भागात २७४.०० चौ.मी. असे एकूण

१०७२.०० चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. याकरीता एकूण रु.२४४.४३ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारीत आहे. कार्यकारी अभियंता (बांध), जि.प.,रायगड यांनी प्रस्तावासोबत सविस्तर अंदाजपत्रक, इमारत बांधकामाचा नकाशा, अस्तित्वातील इमारतीचे फोटो व इमारत बांधकामाचा स्ट्रक्चरल ऑडिट रिपोर्ट, जागेचा उतारा, पं.स.चा ठराव इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत..

३. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जि.प., रायगड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननीअंती श्रीवर्धन पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रुपये २१०.६६ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

४. श्रीवर्धन (जि.रायगड) येथील न.भू.क्र.१५ मधील तहसिल मध्यवर्ती प्रशासकीय इमारतीच्या पहिल्या व दुसऱ्या मजल्यावर श्रीवर्धन पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रुपये २,१०,६६,०००/- (रुपये दोन कोटी दहालक्ष सहासष्ट हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :

१) नियोजित श्रीवर्धन पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता पं.स.च्या नमुना आराखड्याप्रमाणे तहसिल इमारतीच्या पहिल्यावर दुसऱ्या मजल्यावर मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.मं.मुंबई यांच्याकडून प्रमाणबध्द आरेखन करुन घेणे व त्यानुसार इमारतीचे बांधकाम हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.

३) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

५) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध) यांनी दक्षता घ्यावी.

६) या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

७) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

६. श्रीवर्धन पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| **FINAL GENERAL ABSTRACT FOR SHRIVARDHAN P.S., ADMIN., BLDG.** | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of item** | **Amount (in Rs.)** |
| **1** | **Building Civil Work** | **16080941.00** |
| **2** | **Add 11% for Electrification charges** | **1768903.51** |
| **3** | **Add 8% for External Water Supply & Sanitation** | **1286475.28** |
| **4** | **Add 2 % for Rain Water Harvesting & Fire Fighting** | **321618.82** |
| **5** | **Add 4 % for Contingencies charges** | **643237.64** |
| **6** | **Add 6% for Price Variation charges** | **964856.46** |
| | **Total** | **21066032.71** |
| | **Say** | **RS.2,10,66,000/-** |

७. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडुन त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१८१७०३३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Wade Chandrakant Haridas

Digitally signed by Wade Chandrakant Haridas
DN: CN = Wade Chandrakant Haridas, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.09.10 11:04:07 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त कोकण विभाग, नवी मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद रायगड
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद रायगड
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा रायगड
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, रायगड
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा कोकण विभाग, नवी मुंबई
११) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, रायगड
१२) सभापती, पंचायत समिती, श्रीवर्धन, जिल्हा रायगड
१३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, श्रीवर्धन, जिल्हा रायगड
१४) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई